**सहाय्यक प्राध्यापक, संगणक अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा, गट-अ पदावरील सरळ सेवेने नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र. उवतंशि/तांशि-१ /३३/१४/प्र.क्र.(१०३/१३)**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- १८/०१/२०१७

**वाचा** :- १) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे दि. ०२ मार्च २०१६ व दि. १३ जून २०१६ चे पत्र

२) शासनाचा समक्रमांकाचा दि. ०६/०१/२०१७ चा शासन निर्णय

३) महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण, खंडपीठ नागपूर येथे दाखल मूळ याचिका क्र. २१९/१६ व अवमान याचिका क्र.१०/१७

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र. ०२ येथील नमूद पत्रानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने एकूण १२ उमेदवारांच्या नावांची सहाय्यक प्राध्यापक, संगणक अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर नियुक्ती करण्यासाठी शासनास शिफारस केली होती. संदर्भ क्र. ०२ येथील शासन निर्णयान्वये त्यापैकी १० उमेदवारांची सहाय्यक प्राध्यापक, संगणक अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर नियुक्ती करण्यात आली होती. या बाबत श्रीमती स्नेहा फरकडे यांनी नागपूर येथे महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणात दाखल केलेल्या संदर्भ क्र. ०३ येथील न्यायालयीन प्रकरणाच्या अनुषंगाने सदर पदाच्या निवड प्रक्रियेस मा. न्यायाधिकरण, नागपूर यांनी स्थगिती आदेश दिले आहेत. ही बाब विचारात घेता, शासन स्तरावर संदर्भ क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेले आदेश वरील संदर्भ क्र. ०३ येथील मूळ याचिका निकाली निघेपर्यत तूर्तास रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, खंडपिठ नागपूर येथे दाखल झालेले मूळ याचिका निकाली निघेपर्यत उपरोक्त संदर्भ क्र. ०१ अन्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने सहाय्यक प्राध्यापक, संगणक अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर शिफारस केलेल्या उमेदवारांचे संदर्भ क्र. ०२ अन्वये निर्गमित केलेले नियुक्ती आदेश याद्वारे रद्द करण्यात येत आहेत.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१२०१७१४५५२१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shamkant B Parnaik

Digitally signed by Shamkant B Parnaik
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shamkant B Parnaik
Date: 2017.01.20 17:21:45 +05'30'

**( शा. भा. पारनाईक )**
कार्यासन आधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति :-**

सर्व संबंधित उमेदवार

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे).
२. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर/जळगाव
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-/२, मुंबई/नागपूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर/जळगाव
८. निवड नस्ती (तांशि-१).